**इंदिरा आवास योजनेअंतर्गत लाभार्थ्यांना अनुदानाचे प्रदान PFMS प्रणालीव्दारे करण्याची कार्यपध्दती...**

**महाराष्ट्र शासन**

**ग्राम विकास विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः इंआयो-२०१५/प्र.क्र.३२९/योजना-१०**

बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड,

फोर्ट, मुंबई- ४०० ००१

तारीख: १७ जुलै, २०१५

**वाचा —**

१) उप सचिव, भारत सरकार, ग्रामीण विकास मंत्रालय यांचे क्र.M-१२०१८/०२/२०१४-RH (RBS), दिनांक १० एप्रिल, २०१५ रोजीचे पत्र.

२) प्रकल्प संचालक, जि.ग्रा.वि.यंत्रणा,ठाणे यांचे क्र.जिग्रावियं/ठाणे/लेखा-३/९८/२०१५, दि.१०.७.२०१५ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना —**

विविध योजनांच्या लाभार्थ्यांच्या बँकेमधील बचत खात्यात थेट रक्कम जमा करण्याची केंद्र शासनाची महत्वाकांक्षी योजना आहे. महाराष्ट्रामध्ये इंदिरा आवास योजनेअंतर्गत लाभार्थ्यांना अनुदानाचे वाटप पब्लीक फायनान्शियल मॅनेजमेंट सिस्टीम (Public Financial Management System) प्रणालीव्दारे देण्याचे केंद्र शासनाने निदेश दिले आहेत. केंद्र शासनाच्या निदेशानुसार इंदिरा आवास योजनेअंतर्गत लाभार्थ्यांना अनुदानाचे वाटप PFMS प्रणालीव्दारे अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक—**

सन २०१५-१६ या वित्तीय वर्षापासून इंदिरा आवास योजनेच्या लाभार्थ्यांच्या बँक / पोस्ट खात्यामध्ये PFMS (Public Financial Management System) प्रणालीव्दारे थेट अनुदान जमा करण्याचे निदेश केंद्र शासनाने दिले आहेत.

सन २०१५-१६ या वित्तीय वर्षापासून इंदिरा आवास योजनेच्या लाभार्थ्यांना घरकुलाचे अनुदान थेट लाभार्थ्यांच्या बँक/पोस्ट खात्यात जमा करण्यासाठी राज्यस्तरावर एक Debit account उघडण्यात आले असून त्याची PFMS प्रणालीवर नोंदणी करण्यात आली आहे. तसेच सदरचे Debit account आवास सॉफ्टशी संलग्न करण्यात आले आहे.

इंदिरा आवास योजनेअंतर्गत लाभार्थ्यांना घरकुल मंजूरी देतांना सद्यस्थितीत अस्तित्वात असलेली कार्यपध्दतीच कायम राहील. तथापि, अनुदान लाभार्थ्यांच्या बँक/पोस्ट खात्यात थेट जमा करण्यासाठी PFMS प्रणालीचा वापर सन २०१५-१६ पासून करण्याचे या परिपत्रकान्वये अनिवार्य करण्यात येत आहे. सदरचा निधी लाभार्थ्यांच्या बँक/पोस्ट खात्यात थेट जमा करण्यासाठी तालुका

स्तरावरील पंचायत समितीमध्ये कार्यरत असलेले सहायक लेखाधिकारी (पंचायत समिती) यांना First Signatory व गट विकास अधिकारी यांना Second Signatory म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. Digital Signature कार्यान्वित करणे तसेच खंडित करण्याचे अधिकार "राज्य व्यवस्थापन कक्ष-इंदिरा आवास योजना" मधील सहायक संचालक (लेखा) यांना प्रदान करण्यात येत आहेत.

मात्र, राज्य व्यवस्थापन कक्ष-इंदिरा आवास योजना स्थापन होऊन पूर्णत: कार्यान्वयीत होण्यास काही कालावधी लागणार आहे. महात्मा गांधी नरेगा योजनेतील स्वाक्षरीदार व इंदिरा आवास योजनेचे स्वाक्षरीदार एकच आहेत. ही बाब विचारात घेऊन तसेच राज्य व्यवस्थापन कक्ष-इंदिरा आवास योजना पुर्णत: कार्यान्वित होण्यास अपेक्षित कालावधी विचारात घेता दि.३०.९.२०१५ पर्यंत Digital Signature बाबत आवश्यक कार्यवाही करणेबाबत आयुक्त महात्मा गांधी नरेगा, नागपूर यांच्या कार्यालयास प्राधिकृत करण्यात येत आहे. आयुक्त मगांराग्रारोहयो कार्यालयामार्फत Digital Signature कार्यान्वित करणे, तसेच खंडित करणेबाबत कार्यवाही महात्मा गांधी नरेगा योजनेप्रमाणेच इंदिरा आवास योजनेसाठी सुरू राहील.

First Signatory व Second Signatory यांनी त्यांच्या Digital Signature आवास सॉफ्ट प्रणालीवरील Block login मधून Register कराव्यात. सदरचे Registration करतांना संबंधित अधिकाऱ्यांनी आपला भ्रमण दुरध्वनी देणे आवश्यक आहे. जेणेकरून त्यांना पासवर्ड मिळण्यास अडचण येणार नाही. आवास सॉफ्ट प्रणालीवर login करतांना Block level login पुढे " A" लावल्यानंतर ते First Signatory चे User name असेल व "B" लावल्यानंतर Second Signatory चे User name असेल व त्याबाबतचा पासवर्ड संबंधितांच्या भ्रमण दुरध्वनीवर उपलब्ध करून देण्यात येईल.

PFMS प्रणालीव्दारे होणाऱ्या प्रदानासाठी जबाबदार असलेल्या संबंधित अधिकाऱ्यांची बदली, रजा अथवा निवृत्ती व इतर कारणामुळे पद रिक्त झाल्यास त्याचा कार्यभार घेणाऱ्या प्रभारी अधिकाऱ्याची Digital Signature उपलब्ध असल्यास प्रभारी अधिकाऱ्यांनी आपली Digital Signature वापरून प्रदाने करावीत. तथापि, यासाठी जुन्या प्राधिकाऱ्यांची स्वाक्षरी काढून टाकून नवीन Digital Signature PFMS प्रणालीमध्ये नोंदविण्याबाबत "राज्य व्यवस्थापन कक्ष- इंदिरा आवास योजना" मधील सहायक संचालक (लेखा) यांनी कार्यवाही करावी.

Second Signatory गट विकास अधिकारी यांची बदली, बढती, रजा अथवा निवृत्ती व इतर कारणामुळे रिक्त झाल्यास व त्याचा कार्यभार घेणाऱ्या प्रभारी अधिकाऱ्यांची Digital Signature उपलब्ध नसल्यास पेमेंटच्या प्रक्रियेमध्ये खंड पडू नये यास्तव Second Signatory म्हणून सहायक गट विकास अधिकारी किंवा मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी प्राधिकृत केलेले समकक्ष अधिकाऱ्यांनी Second Signatory म्हणून काम पहावे.

First Signatory सहायक लेखा अधिकारी यांची बदली, बढती रजा अथवा निवृत्ती व इतर कारणामुळे रिक्त झाल्यास व त्याचा कार्यभार घेणाऱ्या प्रभारी अधिकाऱ्यांची Digital Signature उपलब्ध नसल्यास पेमेंटच्या प्रक्रियेमध्ये खंड पडू नये यास्तव First Signatory म्हणून जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेतील सहायक लेखाधिकारी किंवा मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी प्राधिकृत केलेले समकक्ष अधिकाऱ्यांनी First Signatory म्हणून काम पहावे.

वरीलप्रमाणे केलेली व्यवस्था ही केवळ तत्कालीक स्वरूपाची पर्यायी व्यवस्था असून अशी व्यवस्था प्रत्येक प्रकरणात जास्तीत जास्त ३० दिवसांसाठी असावी. तथापि, काही कारणास्तव यापेक्षा जास्त कालावधीसाठी अशी पर्यायी व्यवस्था सुरु ठेवावयाची असल्यास संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांनी त्याबाबतचा प्रस्ताव संचालक, "राज्य व्यवस्थापन कक्ष - इंदिरा आवास योजना" यांचेकडे सादर करावा. दरम्यानच्या कालावधीत प्रभारी / नवीन अधिकाऱ्यांची Digital Signature प्राप्त करून घेण्याची कार्यवाही करण्यात यावी. नियमित अधिकारी रूजू झाल्यावर ही व्यवस्था आपोआप संपुष्टात येईल.

इंदिरा आवास योजनेअंतर्गत PFMS प्रणाली पूर्णपणे कार्यान्वित होण्यासाठी काही कालावधी लागणार असल्यामुळे, आयुक्त, महात्मा गांधी नरेगा, नागपूर यांना प्रणालीसंदर्भात मार्गदर्शन करणे व वेळोवेळी आवश्यक कार्यवाही करण्यासाठी प्राधिकृत करण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७१७१७१८२११९२० असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vivek Vishvambhar Gujar

Digitally signed by Vivek Vishvambhar Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vivek Vishvambhar Gujar
Date: 2015.07.17 17:23:11 +05'30'

**( व्ही.व्ही.गुजर )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मंत्री ग्राम विकास यांचे सचिव
२. सर्व विभागीय आयुक्त
३. सर्व जिल्हाधिकारी
४. वित्त विभाग, कार्यासन क्रमांक व्यय-१५ व अर्थसंकल्प ३ व १७
५. आदिवासी विकास विभाग, कार्यासन क्रमांक ६, ७, १२,मंत्रालय, मुंबई-४०००३२

६. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग (का.बांधकामे), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

७. नियोजन विभाग,मंत्रालय, मुंबई-४०००३२

८. महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई

९. महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर

१०.महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखापरिक्षा), मुंबई

११.महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखापरिक्षा) नागपूर

१२.आयुक्त, महात्मा गांधी नरेगा, नागपूर

१३.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व जिल्हे)

१४.प्रकल्प संचालक,जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा ( सर्व जिल्हे )

१५.जिल्हा कोषागार अधिकारी ( सर्व जिल्हे )

१६.अप्पर संचालक,एकात्मिक ग्रामीण विकास कार्यक्रम कक्ष,बांधकाम भवन, मुंबई -१ (५ जादा प्रतीसह)

१७.निवड नस्ती (कार्या. योजना-१०)